**संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ (मर्या.), मुंबई यांना सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता व्यवस्थापकीय अनुदान, ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) मंजूर करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक- चविम-२०१८/प्र.क्र.२०८/महामंडळे**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २४ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :-** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल,२०१८
२) शासन ज्ञापन, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : बीजीटी-२०१७/प्र.क्र.५४/अर्थसंकल्प, दि.१६. एप्रिल,२०१८

**शासन निर्णय** :-

संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ (मर्या.), मुंबई यांचेमार्फत चर्मकार समाजाच्या आर्थिक उन्नतीसाठी विविध योजना राबविण्यात येतात. या महामंडळास सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता व्यवस्थापन व प्रशासनावरील खर्च भागविण्याकरिता ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) यासाठी रु.१,८५,२३,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी पंच्याऐंशी लक्ष तेवीस हजार फक्त) एवढी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

२. संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ (मर्या.), मुंबई या महामंडळास व्यवस्थापन व प्रशासनावरील खर्च भागविण्याकरिता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पित तरतुदीपैकी संदर्भिय क्र.१ व २ नुसार एकूण मंजूर अनुदानाच्या ७०% मर्यादेत एकूण रु.१,२९,६६,१००/- (अक्षरी रुपये एक कोटी एकोणतीस लक्ष सहासष्ट हजार शंभर फक्त) एवढे सहायक अनुदान वितरीत करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे :-

i) योजनेतर निधीतील खर्चासाठी शासनाने ठरविलेले निर्बंध काटेकोरपणे अंमलात आणावेत.
ii) व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.
iii) विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशीलवार माहिती व त्यावर केलेला खर्च याची सविस्तर माहिती शासनास सादर करावी.
iv) कार्यालयीन खर्चात काटकसर करावी.
v) महामंडळाने कर्जाच्या वसुलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी प्रयत्न करावेत.
vi) सदर योजनेचा निधी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासण्याच्या अधीन वितरीत करण्यात येत आहे.

३. उपरोक्त निधीचा खर्च करताना संबंधित अधिकाऱ्यांनी सर्वसाधारण वित्तीय नियम, योजनेच्या अटी व शर्ती, CVC मार्गदर्शक सूचना, CAG निरीक्षणे इ. अनुपालन करुन निधीचा विनियोग करावा.

४. संदर्भ क्र.१ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकासोबतच्या तपासणी सूचीमध्ये नमूद केल्यानुसार प्रत्येक अटीची पुर्तता झाली आहे असे प्रमाणित करण्यात येत आहे

५. वरील अनुदानाबाबत सह सचिव (महामंडळे), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम पुढील कार्यवाही करिता प्रादेशिक उपायुक्त, मुंबई समाजकल्याण, नवी मुंबई यांचेकडे सुपूर्द करण्यात येत आहे. त्यांना सदर अनुदान म.को.नि.४४ मधील नमुन्यातील देयकान्वये संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ (मर्या.), मुंबई यांस संवितरित करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

६. या बाबींवरील खर्च “मागणी क्रमांक एन-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१ अनुसूचित जातीचे कल्याण, ८०० इतर खर्च, (०९) (०३) संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळाला सहायक अनुदान (२२२५ ३५९२) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

७. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०२४१२३३५७९२२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2018.10.24 17:22:31 +05'30'

(अ.कों.अहिरे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. सह सचिव (महामंडळे), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
३. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, कोकण भवन, नवी मुंबई (दोन प्रती),
४. व्यवस्थापकीय संचालक, संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ (मर्या.), मुंबई

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, / जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई,/ठाणे,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. अप्पर कोषागार अधिकारी, कोकणभवन, नवी मुंबई,
९. वित्त विभाग, (का व्यय १४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-३/साउ), मंत्रालय, मुंबई,
१०. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई,
११. कक्ष अधिकारी (का.अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२,
१२. निवड नस्ती (का.महामंडळे).